वाईन उद्योगास प्रोत्साहन या योजनेअंतर्गत
निधी वितरीत करण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- वाप्रोयो-२०२३/ प्र.क्र.८७/ उद्योग-२**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- ०१ ऑगस्ट, २०२३

संदर्भ :-

१) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. डब्ल्यूआयपी २००९/ प्र.क्र.३२८ २००९/ उद्योग-२, दि. ३१/०८/२००९.
२) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,शासन परिपत्रक क्र. डब्ल्यूआयपी २००९/ प्र.क्र.३२८/ २००९ /उद्योग-२, दि. ०१/०२/ २०१०.
३) उद्योग,ऊर्जा व कामगार विभागाचे शासन शुध्दीपत्रक क्र.डब्ल्यूआयपी-२००९/ प्र.क्र.३२८/उद्योग-२, दि. २१/०८/२०१०.
४) उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाचे शासन शुध्दीपत्रक क्र. वाप्रोअ-१७१४/प्र.क्र.३/ उद्योग-२, दि. २७/१०/२०१४.
५) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र४०/अर्थ-३, दि. १२/०४/२०२३
६) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,शासन निर्णय क्र.वाप्रोयो-२०२३/ प्र.क्र८७/उद्योग-२, दि. १९/०६/२०२३
७) अतिरिक्त उद्योग संचालक,उद्योग संचालनालय यांचे पत्र क्र. उसं/साप्रोयो/ वाईन उ.प्रो अनुदान/ दावे/ २०२३/ अे-८६३, दि.१४/७/२०२३

**प्रस्तावना :-**

राज्यातील द्राक्ष उत्पादक शेतकऱ्यांचे नुकसान होऊ नये, शेतकऱ्यांना द्राक्ष लागवडीस प्रोत्साहन देणे, सुकामेवा बनविणे तसेच द्राक्षापासून आर्थिकदृष्ट्या अधिक लाभदायी पर्यायी उत्पादनांची निर्मिती व्हावी तसेच द्राक्षावर आधारीत वाईन उद्योगास प्रोत्साहन म्हणून शासनाने द्राक्ष प्रक्रिया उद्योग धोरण-२००१ दि.१९/१०/२००१ च्या शासन निर्णयान्वये घोषित केले. सदर धोरणाच्या अंमलबजावणीचा भाग म्हणून राज्यामध्ये उत्पादित केलेल्या व अंतिमत: विक्री झालेल्या वाईनच्या विक्रीवर देय असलेल्या २० टक्के मूल्यवर्धीत कर भरल्यास त्यापैकी १६ टक्के कराच्या रकमेइतके वाईन प्रोत्साहन अनुदान वाईन उद्योगास देण्याबाबतची योजना शासनाने दि.३१/०८/२००९ च्या शासन निर्णयान्वये अंमलात आणली आहे.

२. प्रस्तुत योजनेतंर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात या योजनेतंर्गत रुपये ३० कोटी एवढी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे.त्यापैकी सद्य:स्थितीत रुपये ३ कोटी एवढा निधी बीडीएस प्रणालीवर वितरणासाठी उपलब्ध आहे. या योजनेतंर्गत सद्य:स्थितीत सन २०१९-२० वा त्यापूर्वीच्या कालावधीचे प्रलंबित दावे निकाली काढण्याबाबतचे वित्त विभागाचे निर्देश आहेत. सद्य:स्थितीत सन २०१९-२० वा त्यापूर्वीच्या कालावधीचे ३ दावे प्रलंबित असून, सदर दावे निकाली काढण्याकरीता रुपये १,७२,३८,८३१/- एवढया निधीची आवश्यकता आहे. उपलब्ध तरतुदीतून प्रलंबित ३ दावे निकाली काढण्याकरीता रक्कम वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वाईन उद्योगास प्रोत्साहन योजनेतंर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात वितरणासाठी उपलब्ध असलेला निधी विचारात घेऊन, संदर्भ क्रमांक १ ते ४ येथे नमूद केलेले शासन निर्णय/परिपत्रक/ शुध्दीपत्रकातील तरतुदी, निकष, पात्रता इत्यादींची पडताळणी /शर्तीची काटेकोर अंमलबजावणी करण्याची खात्री करुन घेण्याच्या अटींच्या अधीन राहून, उद्योग संचालनालयाकडून प्राप्त झालेले सन २०१९-२० या आर्थिक वर्षात अथवा तत्पूर्वीच्या कालावधीत प्रलंबित असलेल्या दाव्यापोटी खालील विवरणपत्रातील रकाना क्र.२ मध्ये नमूद केलेल्या वाईन उद्योग घटकाला रकाना क्र.५ मध्ये नमूद केल्यानुसार रुपये १,७२,३८,८३१/- (रुपये- एक कोटी बहात्तर लाख अडतीस हजार आठशे एकतीस फक्त) इतका निधी वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | घटकांचे नाव | कालावधी (दिनांक) | दाव्याची मूळ रक्कम (रुपये) | वितरीत करावयाची रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | मे.सुला विनियार्ड प्रा.लि., नाशिक | १/१०/२०१९ ते ३१/३/२०२० | १,६३,४६,९८८ | १,६३,४६,९८८ |
| २ | ओकवुड वाईनरी प्रा.लि., नाशिक | १/४/२०१८ ते ३०/९/२०१८ | ३,००,१४७ | ३,००,१४७ |
| ३ | ओकवुड वाईनरी प्रा.लि., नाशिक | १/१०/२०१८ ते ३१/३/२०१९ | ५,९१,६९६ | ५,९१,६९६ |
| | | **एकूण** | **१,७२,३८,८३१** | **१,७२,३८,८३१** |

३. सदर प्रयोजनार्थ होणारा खर्च मागणी क्रमांक - के ७, लेखाशिर्ष २८५२ - उद्योग (००) (११) वाईन उद्योगास प्रोत्साहन (अनिवार्य) (२८५२ ०४७२), ३३ -अर्थसहाय्य या लेखाशीर्षाखाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता मंजूर अर्थसंकल्पिय अनुदानातून भागविण्यात यावा.

४. वरील परिच्छेदामध्ये नमूद केलेल्या एकूण रुपये १,७२,३८,८३१/- (अक्षरी रुपये एक कोटी बहात्तर लाख अडतीस हजार आठशे एकतीस फक्त) एवढ्या रकमेच्या आहरणाचे आणि महाराष्ट्र विक्रीकर रोखे प्राधिकरणास वितरीत करण्याचे अधिकार विकास आयुक्त (उद्योग),उद्योग संचालनालय,मुंबई यांचे कार्यालयातील लेखाधिकारी यांना देण्यात येत आहेत.

५. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई यांना कळविण्यात येते की, सदर धनादेश लेखाधिकारी, उद्योग संचालनालय यांचे नावे काढण्यात यावा व उद्योग संचालनालयाकडून सदर निधी महाराष्ट्र विक्रीकर रोखे प्राधिकरण, मुंबई यांना अदा करण्यात यावा.

६. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र उद्योग संचालनालयाने महाराष्ट्र विक्रीकर रोखे प्राधिकरणाकडून प्राप्त करुन शासनास त्वरीत सादर करावे.

७. सदरचा शासन निर्णय, शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२/०४/२०२३ मधील परिच्छेद ३ व त्यासोबतच्या परिशिष्टातील तपासणी सूचीमधील अटी व शर्तीची पूर्तता होत असल्याने, प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संगणक संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०८०११६०६५२८३१० असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VINOD SOPANRAO MENDHE

Digitally signed by VINOD SOPANRAO MENDHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=3dfd984bb7c5aede090473e34b1c93fa9f36d97d56c0cf07812a43c5ca5d6a24, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6CAF7EAF9A975C60BD4278CDB26344D74E2548D2175C80BA946EF0383ABE5111, cn=VINOD SOPANRAO MENDHE
Date: 2023.08.02 12:22:17 +05'30'

**( वि.सो.मेंढे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई-४०० ०३२. (५ जादा प्रतीसह)
२. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), मुंबई.
३. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), नागपूर.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६. वित्त विभाग, (कार्यासन अर्थसंकल्प-१४/व्यय-१६) मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७. राज्यकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई -४०० ०१०.
८. राज्यकर सह आयुक्त, विक्रीकर भवन, नाशिक विभाग, पाथर्डी फाटा, नाशिक-४२२०१०.
९. राज्यकर सह आयूक्त (व्हॅट व्यवस्थापन)सोलापूर विभाग,विक्रीकर भवन ,विजापूर रोड,सोलापूर.
१०.राज्यकर सह आयुक्त, मोठे करदाते कक्ष-३ वस्तू व सेवा करभवन,माझगांव,मुंबई.
११.राज्यकर सह आयुक्त पुणे विभाग, पुणे.
१२. आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, मुंबई.
१३. संबंधित घटक
१४. अवर सचिव (प्रशासन-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय -४०० ०३२.